<u>अभ्यागतांसाठी निश्चित वेळ राखून ठेवण्याबाबत.</u>

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण - २०२३/प्र.क्र.०३/१८(र. व का.)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२३.

**संदर्भ :-** १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : संकीर्ण- १०१०/१३०/ प्र.क्र.३७/ १०/१८ (र. व का.), दिनांक ०४ जून, २०१०.
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : संकीर्ण- २०१३/प्र.क्र.२४/ १८ (र. व का.), दिनांक २७ मे, २०१३.
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : संकीर्ण- २०१६/प्र.क्र.०९/ १८ (र. व का.), दिनांक ०२ फेब्रुवारी, २०१६.

**प्रस्तावना-**

अभ्यागतांच्या तक्रारींची / कामांची दखल घेऊन त्यांचे समाधान करण्याच्या दृष्टीने मंत्रालयात मा.मंत्री महोदयांकडे भेटीसाठी येणाऱ्या अभ्यागतांसाठी विभागाच्या कामकाजाचे स्वरूप विचारात घेऊन आठवडा / पंधरवडा / महिना यांतील एक ठराविक दिवस निश्चित करून त्याची कल्पना अभ्यागतांना देण्याबाबत संदर्भाधीन दिनांक ४ जून २०१० च्या परिपत्रकान्वये मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांना विनंती करण्यात आली आहे. तक्रारी/शासकीय कामे घेऊन मंत्रालयातील अधिकाऱ्यांना भेटण्यासाठी येणाऱ्या अभ्यागतांसाठी दुपारी २.३० ते ३.३० ही समान वेळ राखून ठेवण्याबाबत व या कालावधीत शक्यतो विभागांतर्गत बैठकांचे आयोजन न करण्याबाबत, तसेच क्षेत्रीय पातळीवरील प्रत्येक शासकीय कार्यालयातील अधिकाऱ्यांनी जनतेच्या भेटीसाठी शक्यतो दुपारनंतरची वेळ राखून ठेवण्याबाबत व इतर अनुषंगिक सूचना संदर्भाधीन दिनांक २७ मे, २०१३ च्या परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. तदनंतर या विषयी दिनांक ०२ फेब्रुवारी, २०१६ रोजी शासन परिपत्रक निर्गमित करण्यात आले आहे.

यासंदर्भात दिनांक ०४ जून, २०१०, दिनांक २७ मे, २०१३ व दिनांक ०२ फेब्रुवारी, २०१६ ची शासन परिपत्रके अधिक्रमित करून पुढीलप्रमाणे सुधारित सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

**परिपत्रक :-**

अभ्यागतांच्या तक्रारींची / कामांची दखल घेऊन त्यांचे समाधान करण्याच्या दृष्टीने मा.मंत्री / मा.राज्यमंत्री /मंत्रालयीन अधिकारी व क्षेत्रिय अधिकारी यांचेकडे पूर्वपरवानगीने / पूर्वपरवानगीशिवाय भेटीसाठी येणाऱ्या अभ्यागतांसाठी विभागाच्या कामकाजाचे स्वरूप विचारात घेऊन मा.मंत्री / मा.राज्यमंत्री /मंत्रालयीन अधिकारी व क्षेत्रिय पातळीवरील अधिकाऱ्यांनी जनतेच्या भेटीसाठी विवक्षीत दिनांक व वेळ राखून ठेवण्याच्या दृष्टीने खालीलप्रमाणे कार्यवाही करावी:-

१) मा.मंत्री / मा. राज्यमंत्री महोदयांनी त्यांच्याकडील कामकाजाचे स्वरूप विचारात घेऊन आपल्या सोईनुसार अभ्यागतांना भेट देण्यासाठी आठवडा /पंधरवडा /महिना यांतील एखादा ठराविक दिवस व वेळ निश्चित करून त्याबाबतची कल्पना अभ्यागतांना देण्यात यावी व भेटीची वेळ दर्शविणारा फलक कार्यालयाच्या दर्शनी भागावर लावण्यात यावा.

२) मंत्रालयीन अधिकाऱ्यांनी कार्यालयीन कामकाजाचे दिवशी दुपारी ३.०० ते ४.०० ही समान वेळ जनतेच्या भेटीसाठी राखून ठेवावी व या कालावधीमध्ये शक्यतो विभागांतर्गत बैठकांचे आयोजन करण्यात येऊ नये.

३) क्षेत्रीय पातळीवरील प्रत्येक शासकीय कार्यालयातील अधिकाऱ्यांनी जनतेच्या भेटीसाठी आठवड्यातून किमान दोन दिवस निश्चित करुन ठराविक वेळ राखून ठेवावी. ही वेळ दुपारनंतर ठेवण्यात यावी. या राखीव वेळेत शक्यतो बैठकांचे आयोजन करण्यात येऊ नये.

४) क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी कर्तव्याचा भाग म्हणून दौऱ्यांचे आयोजन अशा प्रकारे करावे की, लोकांच्या भेटीसाठी राखून ठेवलेल्या वेळेवर त्याचा परिणाम शक्यतो होणार नाही. या दृष्टीने क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी कर्तव्याचा भाग म्हणून करावयाचे दौरे वा भेटी यासाठी आठवडयातील ठराविक दिवस निश्चित करावेत व त्याची माहिती कार्यालयाच्या सूचना फलकावर प्रदर्शित करण्यात यावी. जनतेस याबाबतची निश्चित माहिती मिळाल्यामुळे त्यांची गैरसोय होणार नाही.

५) दौरे, भेटी यामुळे जर क्षेत्रीय अधिकाऱ्यास कार्यालयात उपस्थित रहाणे शक्य नसेल तर अशा प्रसंगी जनतेच्या भेटीसाठी पर्यायी व्यवस्था करण्यात यावी.

२. मंत्रालयीन प्रशासकीय विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग/कार्यालये, जिल्हा परिषदा, पंचायत समित्या, ग्रामपंचायती या ग्रामीण स्थानिक संस्थांना तसेच महानगरपालिका, नगरपरिषदा / नगरपंचायती या नागरी स्थानिक संस्थांना सूचित करण्यात येते की, त्यांनी कार्यालयात भेटीसाठी येणा-या अभ्यागतांसाठी मध्यवर्ती रजिस्टर ठेवावे. तसेच अभ्यागतांच्या प्रवेशासाठी पासेसची आवश्यक सोय करावी. अधिका-यांना पूर्वपरवानगीने/पूर्वपरवानगीशिवाय भेटणाऱ्या अभ्यागतांसाठी दिवस/वेळ निश्चित करुन त्याबाबतची माहिती सूचना फलकावर कार्यालयाच्या दर्शनी भागामध्ये प्रदर्शित करण्यात यावी.

३. सर्व मंत्रालयीन विभागांना सूचित करण्यात येते की, सदर परिपत्रक हे त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास आणावे.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३२७१४०८४९८९०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANU KUMAR SRIVASTAVA

Digitally signed by MANU KUMAR SRIVASTAVA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CHIEF MINISTER OFFICE,
2.5.4.20=69e8286c0fd651c2fdd4d5adf53fe4bf7d549093aa9b31ef07ab56c6462c64d0, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=2B26DFB0EC2868CFE96996E8AEE05B95CF10D67702D55FED97107E82D9A153CD, cn=MANU KUMAR SRIVASTAVA
Date: 2023.03.28 16:20:22 +05'30'

( मनु कुमार श्रीवास्तव )
मुख्य सचिव

**प्रत-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

३. मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
८. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
९. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
१०. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य.
११. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२. सचिव, राज्य निवडणूक आयोग, पहिला मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई-४०० ०३२.
१३. मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१४. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, राज्य सेवा हक्क आयोग, मुंबई.
१५. महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१६. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बँक ऑफ इंडिया इमारत, मुंबई-४०० ०२३.
१८. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
१९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
२०. सर्व विभागीय आयुक्त.
२१. सर्व जिल्हाधिकारी.
२२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
२३. प्रबंधक, मा. मुंबई उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
२४. प्रबंधक, मा. मुंबई उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
२५. प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, १ ला मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई-४०० ०३२.
२६. मंत्रालयाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख.
२७. निवड नस्ती (कार्यासन-१८), सामान्य प्रशासन विभाग.